**मुंबई मेट्रो लाईन-३ या प्रकल्पाकरिता आझाद मैदानातील (भूकर क्र.७२९) ३०७७६.४६ चौ.मी. इतक्या जागेस पुढील ३ वर्षाकरिता तात्पुरत्या स्वरूपात मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-साबांज-२०२१/प्र.क्र.१४६/मिव्य-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
दिनांक - १६ डिसेंबर,२०२१

वाचा:-

१.महसूल व वन विभाग,परिपत्रक क्रमांक-जमिन-०४/२००६/प्र.क्र.३५/ज-१,दि.८.९.२००८
२. सार्वजनिक बांधकाम विभागाचे क्र. साबांज-२०१५/प्र.क्र.२३८/मिव्य १, दि.०६ जून,२०१६
३. मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लिमिटेड यांचे क्र.मु.मे.रे.कॉ.ली/मेट्रोलाईन-३/भूमी शाखा/भू.क्र.७२९/१६३/२०२१/२४८१, दि.२२.११.२०२१ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्र.१ येथील महसूल व वन विभागाच्या परिपत्रकास अनुसरून, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनुक्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या ताब्यातील मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लिमिटेड यांना कायमस्वरूपी लागणारे भूकर क्र.७२९ आझाद मैदान येथील ७१८ चौ.मी. क्षेत्र हस्तांतरीत करण्यास मान्यता देण्यात आली आहे. तसेच तात्पुरत्या स्वरूपात लागणारे भूकर क्र.७२९ आझाद मैदान येथील ३०७७६.४६ चौ.मी. क्षेत्र, अटींच्या अधीन राहून ५ वर्षाच्या कालावधीसाठी हस्तांतरीत करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. अनुक्रमांक ३ अन्वये मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लिमिटेड यांनी काही अपरिहार्य कारणामुळे काम पूर्ण होऊ न शकल्यामुळे, तसेच कामकाज पुढील ३ वर्ष चालण्याची शक्यता असल्याने, तात्पुरत्या वापरात असलेले भूकर क्र.७२९ आझाद मैदान येथील ३०७७६.४६ चौ.मी. क्षेत्रास सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अ.क्र.२ मधील अटी व शर्तीनुसार पुढील ३ वर्षाकरिता मुदतवाढ देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

उपरोक्त पार्श्वभूमीच्याआधारे, अनुक्रमांक ३ येथील मुंबई मेट्रो रेल कॉर्पोरेशन लिमिटेड यांनी पत्रान्वये केलेल्या मागणीच्या अनुषंगाने, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनुक्रमांक २ येथील शासन निर्णयात नमूद केल्यानुसार, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या क्रमांक- साबांज-२०१५/प्र.क्र.१४२/मिव्य-१ या प्रकरणावर नगर विकास विभागाने दिलेल्या अभिप्रायानुसार नगर विकास विभाग,गृह विभाग,पर्यावरण विभागाचे अभिप्राय/ना-हरकत घेणे आवश्यक राहील.

२. मेट्रोलाईन -३ प्रकल्पासंदर्भातील कामकाज पूर्ण झाल्यानंतर आझाद मैदान पूर्ववत स्थितीत आणून त्यानंतर त्याचा ताबा पुनश्च सार्वजनिक बांधकाम विभागाकडे देण्याची कार्यवाही मुंबई मेट्रोरेल कॉर्पोरेशन लि.यांनी करणे आवश्यक राहील, या अटींच्या अधीन राहून सार्वजनिक बांधकाम विभागाच्या ताब्यातील भूकर क्र.७२९ आझाद मैदान येथील तात्पुरत्या स्वरूपात लागणारे ३०७७६.४६ चौ.मी. क्षेत्रास पुढील ३ वर्षाकरिता मुदतवाढीस मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला असून त्यांचा संगणक सांकेतांक क्रमाक २०२११२१६१६१९४६७९१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Rajendra Krushnarao Jawanjal

Digitally signed by Rajendra Krushnarao Jawanjal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=19593fdee7ff75cbd39f30455aa878eb8713956549ef45aca9ee3530a01dd62f, cn=Rajendra Krushnarao Jawanjal
Date: 2021.12.16 16:21:01 +05'30'

**(राजेंद्र जवंजाळ)**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. राज्यपालांचे परिवार प्रबंधक,राजभवन मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई.
३. मा.मंत्री,सार्वजनिक बांधकाम विभाग,यांचे स्वीय सहाय्यक.
४. अपर मुख्य सचिव,महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई.
५. प्रधान सचिव, नगर विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
६. प्रधान सचिव, गृह विभाग,मंत्रालय,मुंबई.
७. प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग,मंत्रालय,मुंबई.
८. प्रधान सचिव, पर्यावरण विभाग,मंत्रालय,मुंबई.
९. जिल्हाधिकारी,मुंबई.
१०.व्यवस्थापकीय संचालक,मुंबई मेट्रो रेल कार्पोरेशन लि.,मुंबई.
११.मुख्य अभियंता,सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,मुंबई.
१२.अधीक्षक अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ,मुंबई.
१३.कार्यकारी अभियंता,इलाखा शहर विभाग,मुंबई.
१४.सर्व मंत्रालयीन विभाग.
१५.निवड नस्ती.